नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत नवीन शासकीय गोदाम बांधकामांना निधी उपलब्ध करून देणेबाबत.
(सन २०१९-२०)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां १०१९/प्र.क्र.३१/नापु-१६ ब**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
दिनांक:- २० मार्च, २०२०.

वाचा

१. **शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१५/प्र.क्र.१०६६/नापु-१६-ब, दि.०९.०७.२०१८.**
२. **शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१८/प्र.क्र.७३/नापु-१६-ब, दि.२५.०७.२०१८.**
३. **शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१९/प्र.क्र.३१/नापु-१६-ब, दि.२८.०५.२०१९, दि.०६.०८.२०१९ व दि.१३.०२.२०२०.**

**प्रस्तावना**

उक्त संदर्भाधीन शासन निर्णय दि.२८.०५.२०१९ व दि.०६.०८.२०१९ अन्वये सन २०१८-१९ व सन २०१९-२० मध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या काही गोदाम बांधकामांना निधी वितरीत करण्यात आला होता. सदर निधी खर्ची टाकण्याबाबत वारंवार पाठपुरावा करुनही त्यापैकी काही निधी संबंधित गोदाम बांधकामावर प्रत्यक्ष खर्ची टाकण्यात येत नसल्याने जिल्हा पुरवठा अधिकारी, जळगाव, वर्धा, चंद्रपूर, भंडारा व बुलढाणा तसेच अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर यांनी उक्त संदर्भीय शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी शासनास समर्पित केला आहे. तसेच वित्त विभागाने नवीन गोदाम बांधकाम या लेखाशीर्षांतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या ₹ ८७,२६,२८,०००/- पैकी राखून ठेवलेला ४०% निधी ₹ ३४,९०,५१,२००/- वितरणासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. सदर समर्पित निधी व वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेला निधी नवीन गोदाम बांधकामांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सन २०१८-१९ व सन २०१९-२० मध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या नवीन गोदाम बांधकामांना निधी वितरीत करण्यात आला होता. त्यापैकी जिल्हा पुरवठा अधिकारी, जळगाव यांनी ₹५०,००,०००/-, जिल्हा पुरवठा अधिकारी, वर्धा यांनी ₹ १,०८,७९,०००/-, जिल्हा पुरवठा अधिकारी, चंद्रपूर यांनी ₹१,६०,७५,५१२/-, जिल्हा पुरवठा अधिकारी, भंडारा यांनी ₹३,४०,००,०००/-, जिल्हा पुरवठा अधिकारी, बुलढाणा यांनी ₹१,९८,८०,०००/- व अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर यांनी ₹८५,००,०००/- असा एकूण ₹९,४३,३४,५१२/- एवढा निधी शासनास समर्पित केला आहे.

तसेच वित्त विभागाने नवीन गोदाम बांधकाम या लेखाशीर्षांतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या ₹८७,२६,२८,०००/- पैकी राखून ठेवलेला ४०% निधी ₹३४,९०,५१,२००/- वितरणासाठी

अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. सद्यस्थितीत नवीन गोदाम बांधकाम या लेखाशीर्षांतर्गत वरीलप्रमाणे जिल्हयांनी समर्पित केलेला व वित्त विभागाने मुक्त केलेला असा एकूण ₹४४,३३,८५,७१२/- वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यानुसार प्रशासकीय मान्यतेसंबंधित संदर्भाधीन शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे गोदाम बांधकामांना निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार अंदाजित खर्च (₹) | यापूर्वी वितरीत निधी (₹) | सदर आदेशान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी (₹) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | नाशिक | दिंडोरी | दिंडोरी | ७,५०,६१,३९२ | २,३०,५१,४१८ | ३,००,००,००० |
| २. | नाशिक | निफाड | पिंपळगाव (बसवंत) | ७,८६,९०,८९२ | ४,३२,४५,६९८ | ३,०३,६२,००० |
| ३. | नाशिक | चांदवड | चांदवड | ५,०९,४९,५४० | १,५२,८४,८६० | ३,१०,००,००० |
| ४. | नाशिक | येवला | मौजे अंगणगाव | ६,९३,५७,८९२ | ३,०८,०७,३६८ | ३,४५,००,००० |
| ५. | नाशिक | त्र्यंबकेश्वर | मौजे तळेगाव | ७,३६,१२,६४२ | २,३९,७७,७९३ | १,००,००,००० |
| ६. | नाशिक | इगतपूरी | इगतपूरी | ७,४६,९५,३९२ | १,४६,३८,४३० | २,४३,६२,००० |
| ७. | नाशिक | सिन्नर | मुसळगाव | ७,६०,३७,३९२ | २,२८,११,२१८ | ३,०५,००,००० |
| ८. | नाशिक | सुरगाणा | सुरगाणा | ७,५०,६१,३९२ | २,५५,१९,४१८ | ४,५०,००,००० |
| ९. | नाशिक | पेठ | पेठ | ३,६५,९७,४३५ | १,२१,६५,२३० | २,००,००,००० |
| १०. | नाशिक | कळवण | मौजे भेंडी | ५,२६,५७,८९८ | १,६६,८३,३६९ | २,००,००,००० |
| ११. | नाशिक | मौजे निळगव्हाण | मालेगाव | १४,७६,५९,९८२ | ५,८९,३६,४२५ | ६,०३,६२,००० |
| १२. | सांगली | आटपाडी | आटपाडी | ३,९०,६०,१९३ | १,१७,१८,०५८ | १,२५,००,००० |
| **एकूण** | | | | | | **३४,८५,८६,०००/-** |
| **(अक्षरी रुपये :- चौत्तीस कोटी पच्याऐंशी लक्ष शहाऐंशी हजार फक्त)** | | | | | | |

२. उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने सुरु करण्यात यावीत.

**३ संबंधित गोदामासाठी मंजूर केलेला निधी प्रत्यक्ष खर्ची होताच निधीच्या विनियोगाचे उपयोगिता प्रमाणपत्र त्वरीत शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.**

४. बांधकामास विलंब अथवा इतर कारणांनी गोदाम बांधकामाचा खर्च वाढीव होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

५. सदर गोदाम बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

६. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वत: भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबतची खातरजमा करावी. काही त्रुटी राहिल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरीक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

७. हे आदेश प्राप्त होताच सदरील तरतुद जिल्हाधिकाऱ्यांमार्फत तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित कार्यकारी अभियंता यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात यावी. धनादेशाने आहरीत करण्यात येऊ नये.

**८. सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी माहे ३१ मार्च, २०२० अखेर खर्ची टाकावा. या आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ठेव अंशदान म्हणून वर्ग करता येणार नाही.**

९. संबधित गोदाम बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता आदेशानुसारच्या छाननीअंती सुधारित अंदाजित खर्चापेक्षा अधिक निधी वितरित होणार नाही याबाबत संबधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेले अनुदान दि.३१ मार्च, २०२० पर्यंत खर्च करण्यात यावे. याबाबतची संपूर्ण जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील, याची नोंद घ्यावी.

१०. उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष '४४०८, ०२ अन्न, साठवण व वखार वरील भांडवली खर्च, ०२, साठवण व वखार साठवण १०१, ग्रामीण भागात गोदाम बांधणे कार्य़क्रम (०१) नविन गोदामाचे बांधकाम (०१) (०१) नवीन गोदामांचे बांधकाम करणे (मुफसल) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षातर्गत व सन २०१९-२० या वित्तीय वर्षात उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

११. वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ च्या भाग-१ उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास प्राप्त झालेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२०११४६२६९००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Girdhar Chavan

Digitally signed by Pradip Girdhar Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food, Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=46ad1667fce35440d37e8567cc278d78039b81154909a1162e319e905bd4e93b,
serialNumber=f7e9a44534c5a6e0d2062d6f59ec690169fc00c18def69311f356364b1870337, cn=Pradip Girdhar Chavan
Date: 2020.03.20 11:49:03 +05'30'

**( प्र.गि.चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी, नाशिक व सांगली.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, नाशिक व पुणे.
३. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
४. उप आयुक्त ( पुरवठा ), नाशिक व पुणे.
५. जिल्हा पुरवठा अधिकारी, नाशिक व सांगली.
६. कार्य़कारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक व सांगली.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक व सांगली.
८. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
११. वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय, अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१३. सहाय्यक संचालक (संगणक) लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१४. उपमहाव्यवस्थापक,नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे- ४११००५.
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१६. निवड नस्ती/नापु-१६ब.